# अमेलिया एरहार्ट

## अमेरिकी महिला वैमानिक

सॅडलबॅक शैक्षणिक प्रकाशन



# अमेलिया एरहार्ट

## अमेरिकी महिला वैमानिक

मराठी अनुवादः सुशील मेन्सन





ती जिज्ञासू आणि साहसी होती. विमानोड्डाणात स्त्रिया पुरुषांपेक्षा तसूभरही कमी नाहीत, हे तिला सिद्ध करायचे होते.

*अमेलिया एरहार्ट*. आधी एक सहकारी म्हणून आणि नंतर एकाच इंजिनाच्या छोट्याशा विमानाची वैमानिक म्हणून तिने एकटीने अटलांटिक महासागरावरून उड्डाण केले. इतिहासातील ती पहिलीच अशी स्त्री होती.

वादळ येणार बहुधा!

हो, *कॅन्ससम*ध्ये मोठी वादळं येतात.

अमेलिया एरहार्टचा जन्म 24 जुलै 1898 रोजी कॅन्सस राज्यातील *एट्चीसन* शहरात झाला. तिच्या वडिलांचे आईवडील स्थलांतर करून तिथे स्थायिक झाले होते.


अमेलियाच्या आईची आई *ओटीस* राज्यातून स्थलांतर करून कॅन्ससला आली होती. तेव्हा तिथे बरेच मूळ अमेरिकी लोक राहात होते.
काही करणार नाहीत ते. त्यांना आपलं कुतूहल वाटतंय.
कळतंय मला, पण तरीसुद्धा भीती वाटते.


अमेलियाला मात्र त्या लोकांबद्दल जाणून घ्यायला आवडे.
मीच त्यांना पहिल्यांदा शोधून काढलं असतं तर!
असं अज्ञात जग प्रत्येक काळात असतंच कुठेतरी. कुणीतरी त्यांचा शोध घेतोच.


अमेलियाचे वडील रेल्वेखात्यात वकील म्हणून काम करत. कामानिमित्त ते बराच प्रवास करत. अमेलिया आणि तिची बहीण *म्युरील* यांचा बराचसा वेळ ओटीसच्या आजीआजोबांच्या संगतीत जात असे.
चला, एट्चिसन आलं.
कधी एकदा आजीकडे जातोय, अस झालंय मला.


त्यांना ओटीसहून आलेले आजीआजोबा आणि त्यांचं सफेद घर खूप आवडे. पण कधीकधी काही समस्यादेखील येत.
अगं आजी, ते कपडे आईने घेतलेयत, माझ्यासाठी.


स्कर्टपेक्षा हे बरे आहेत. खेळलं, धावलं, उड्या मारल्या तरी हे फाटत नाहीत.
पण मुलींनी असे कपडे घालू नयेत. तू शांतपणे एका जागी बसून बाहुल्यांशी का नाही खेळत?


लहान होते तेव्हा मी कंबरेवर रिंग फिरवायचा खेळ खेळायचे. चला, आता जरा चांगले कपडे घाला बघू.
हो आजी.


एका खास प्रसंगी, त्यांचे वडील त्यांना *सेंट लुईस*च्या जत्रेत घेऊन गेले. त्यांनी *रोलर कोस्टर*मध्ये खूप मजा केली.
बाबा, मी चक्क उडतेय!

एट्चिसनमध्ये परतल्यावर
अमेलियाला एक कल्पना सुचली.













अमेलिया मोठ्या खुशीत फळीवर चढून आपल्या गाडीत बसली आणि तिला धक्का दिला.
बघा मी आऽऽले! ओहो, किती मजा येतेय!


फळीवरून अमेलियाची गाडी घसरत जमिनीवर आदळली. ती गाडीतून बाहेर फेकली गेली आणि कोलांट्या खात खाली पडली.
अगं आई गंऽऽऽऽ!


फार लागलं का गं!
अजिबात नाही. आपला ट्रॅक आणखी खाली आणायला हवा. चला आणूया.


पण आजी अमेलियाला ओरडली.
कशाला जीवाशी खेळतेयस अमेलिया! ते फळकुट इथून काढूनच टाकते मी.
मजा करतोय आजी आम्ही.

अमेलियाला आजोबांची पुस्तके वाचायला आवडत. त्यांतील बऱ्याच पुस्तकांमध्ये साहसी गोष्टी होत्या.

वाचन हे स्त्रियांसाठी चांगलं काम आहे.

कमाल आहे! सगळ्या गोष्टींचे नायक पुरुषच का आहेत?

मुलींनी फिरू नये, साहसं करू नयेत का? मी कधीतरी नक्की काही करेन.

1908 साली अमेलिया 10 वर्षांची असताना तिचे वडील तिला *आयोवा* राज्यात घेऊन गेले.

प्लीज बाबा, आणखी थोडा वेळ.

तिथे खरेखुरे घोडे आहेत. त्यांच्यावर बसू?

पण मला तुम्हाला नवं काही दाखवायचंय, एक हवेत उडणारं यंत्र.

शेवटी, त्यांनी मुलींना उडणाऱ्या यंत्रापाशी आणलंच.

पाच वर्षांआधी हेच विमान पहिल्यांदा हवेत उडालं. अविस्मरणीय घटना होती ती!

पण विमान बघून अमेलियाला काही विशेष वाटले नाही.










तिने *स्पॅदिना लष्करी हॉस्पीटल*मध्ये सकाळी सातपासून संध्याकाळी सातपर्यंत काम केले.









एकदा तिची मैत्रीण तिला सैनिकांना विमान उड्डाणाचे प्रशिक्षण देणाऱ्या तळावर घेऊन गेली.










युद्ध संपल्यावर ती न्यूयॉर्कला *कोलंबिया* विद्यापीठात वैद्यकिय शिक्षण घेण्यास गेली. पण वर्षभरातच तिने ते सोडून दिले.







मग अमेलिया आईवडिलांच्या इच्छेनुसार कॅलिफोर्नियात त्यांच्यासोबत राहायला गेली.

ती वडिलांसोबत एकदा विमानांच्या कसरती बघायला गेली. विमाने उडाल्यावर एकजण त्याच्या पंखावर तोल सावरत उभा राहीला. लोकांनी श्वास रोखून धरले.




मग इतर विमाने उडू लागली. त्यांना दोर लटकत होते.

दोर डोक्यावर आल्यावर....

एकजण वर हवेत झेपावला....

....आणि दोर पकडून वर चढत गेला.




हवेत चक्राकार वळणे घेणारी विमाने बघून अमेलिया हरखली.






तिच्या पहिल्या विमान प्रवासात वैमानिक होता, *फ्रँक हॉक्स*. नंतर त्याने वेगाचे कित्येक विक्रम केले.




आता ती स्वत: विमान उडवायचे स्वप्न बघू लागली. त्यासाठी ती एका टेलिफोन कंपनीत नोकरी करू लागली.




दर आठवड्याच्या शेवटी वैमानिकाचे प्रशिक्षण असे. *कर्टीस स्कूल ऑफ एव्हिएशन*मधून पदवीप्राप्त झालेली पहिली स्त्री, *नेटा स्नूक*, या तिच्या प्रशिक्षक होत्या..



हळूहळू ती विमान उडवायला शिकली. कधीकधी आणीबाणीच्या प्रसंगी तिचे विमान उलटलेही.




तिने माजी लष्करी प्रशिक्षक *जॉन मँटिजो* यांच्याकडून प्रगत प्रशिक्षणही घेतले.







अखेरीस, तो महान दिवस उगवला. अमेलियाने एकटीने विमानाचे उड्डाण केले.



वयाच्या चोविसाव्या वाढदिवशी 24 जुलै 1922 रोजी अमेलियाला आईवडिलांनी आणि म्युरीलने एक छोटे विमान भेट दिले.





















अनेक नोकऱ्या केल्यावर ती शेवटी बोस्टन येथील *डेनिसन हाऊस* येथे सामाजिक कार्यकर्ती बनली.



एप्रिल 1928 मध्ये एके दिवशी ती मुलांकडून एका नाटकाची तालीम करून घेत होती.

अमेलिया, तुमचा फोन.

नंतर करायला सांगा. मी कामात आहे.



पण पलिकडची व्यक्ती हटूनच बसली. मग अमेलियाने फोन घेतला.

मी कॅप्टन *हिल्टन* बोलतोय. तुम्हाला विमानोड्डाणाचा नवा विक्रम करायचाय का?

कोणता विक्रम?

तुम्ही अटलांटिक महासागर पार करावा, असं मला वाटतंय.

का नाही! नवनवं साहस करायला मी आतुरच असते.

वर्षभरापूर्वी तरूण *चार्ल्स लिंडबर्ग* एकट्याने अटलांटिक महासागर पार करून जगप्रसिद्ध झाला. पण अशाच प्रयत्नात तीन स्त्रिया मात्र मृत्युमुखी पडल्या.

*फ्रेडरिक गेस्ट* या श्रीमंत अमेरिकी स्त्रीने एका इंग्रज व्यक्तिशी लग्न केलंय आणि तिला एका स्त्रीने हा विक्रम करावा असं वाटतंय, कॅप्टन *रेले* म्हणाले.

गेस्ट बाईंनी *फ्रेंडशीप* हे विमान खरेदी केलंय. कुणा स्त्रीने ते स्वत: अमेरिकेतून उड्डाण करून इंग्लंडला सदिच्छाभेट द्यावी, अशी त्यांची इच्छा आहे.



मीच वैमानिक असणार का?




मंजूर असेल तर तुला न्यूयॉर्कला जाऊन निवड समितीला भेटावं लागेल.




समितीने अमेलियाला या प्रवासासाठी योग्य ठरवले. बोस्टनला परतून तिने गेस्टबाईंचे विमान पाहिले आणि ती आपल्या सहकाऱ्यांना भेटली.




अनुकूल हवामानासाठी त्यांना काही आठवडे वाट पाहावी लागली. तेथील प्रमुख *जॉर्ज पामर* यांनी अमेलियाचा चांगला पाहुणचार केला.




मी प्रकाशक आहे आणि लिंडबर्गचा मित्रसुद्धा. साहसी लोकांसोबत राहायला मला आवडतं.

3 जून रोजी त्यांनी *न्यू फाऊंडलंड*कडे उड्डाण केले. तिथे ते दोन आठवडे थांबले. मग 17 जून 1928 रोजी सकाळी 11 वाजता त्यांनी पुन्हा उड्डाण केले.




त्यांना वादळे, वेगवान वारे आणि मुसळधार पावसाला तोंड द्यावे लागले.



अमेलियाने सर्व बारीकसारीक नोंदी केल्या.




संपूर्ण दिवस आणि रात्र ते उडत राहिले. पण ते नेमक्या दिशेने जात होते का?







3,000 फूट उंचीवर ते धुके आणि अंधारातून बाहेर पहाटेच्या संधिप्रकाशात आले. खाली एक जहाज दिसत होते.


मी ही चिठ्ठी बांधून संत्र फेकते जहाजावर. ते सांगतील इशाऱ्याने, जवळ कुठे जमीन आहे ते.
तिने दोन संत्री खाली फेकली. पण दोन्हीवेळा ते जहाजावर पडले नाही.


आतापर्यंत जमीन दिसायला हवी होती. विमानात फक्त एक तास पुरेल इतकंच इंधन आहे. जहाजानजिक उतरायचं का? की जायचं तसंच पुढे?


ते तसेच पुढे गेले. मग त्यांना खाली काही लहानलहान बोटी दिसल्या.
मासेमारीच्या बोटी! म्हणजे जमीन नजिकच आहे. पण कोणत्या दिशेत?


आणि अचानक त्यांना समोर जमीन दिसू लागली.
हे *इंग्लंड* आहे की *आयर्लंड*?
काय फरक पडतो? मला विमान शहरानजिक एखाद्या शांत जलाशयात उतरवायचंय.

बिलने विमान व्यवस्थित उतरवले. स्लिमने विमान खुणेच्या ठिकाणी बांधून ठेवले. अमेलियाने किनाऱ्यावर उभ्या असलेल्या माणसाला झेंडा दाखवला.




थोड्याच वेळात एक पोलीस तिथे आला.




त्यांचे किनाऱ्यावर स्वागत करण्यात आले.




जगभरात ही बातमी पसरली. इंग्लंडमध्ये पंधरवडाभर त्यांचे सत्कारसोहोळे सुरू होते. मग ते न्यूयॉर्कला परतले.




पण अमेलिया समाधानी नव्हती. ती तिचे सल्लागार आणि व्यवस्थापक, *जॉर्ज पुटनम*शी याबाबत बोलली.
मी कौतुकाची मानकरी नाही. मी एकटी विमान चालवून अटलांटिक पार करेन तेव्हाच समाधान होईल माझं.
नक्कीच करशील तू.


पण आता तू फ्रेंडशीप प्रवासावर पुस्तक लिही. मी प्रकाशित करीन. आपण त्याला *20 तास 40 मिनिटे* असं शीर्षक देऊ.
काही आठवड्यांतच तिने पुस्तक पूर्ण केले. मग ती पुन्हा विमान उडवण्याची तयारी करू लागली.


तिने इंग्लंडमध्ये एक छोटे विमान खरेदी केले होते. त्यातून ती प्रशांत महासागराच्या किनाऱ्यावरून उडणार होती.
मी रात्री विश्रांती घेण्यासाठी आणि इंधन भरण्यासाठी थांबे घेईन.
पहिल्यांदाच कुणी स्त्री संपूर्ण अमेरिका पालथा घालणार आहे.


आभाळातून सर्व शहरे एकसारखीच दिसत. तिथे विमानतळ नव्हते, काही खुणा नव्हत्या. एकदा रात्री इंधन संपत आल्यावर तिने विमान थेट न्यू मेक्सिको प्रांतीतील *हॉब्स* शहराच्या रस्त्यावर उतरवले.
पण कोणतीही गंभीर दुर्घटना न होता ती कॅलिफोर्नियाला आपल्या घरी सुखरुप पोहोचली.

तिने प्रथमच *एअर डर्बी* विमानाचे उड्डाण केले, उड्डाणांवर लेख लिहिले, ती विमान कंपनीची अधिकारी बनली, तिने अनेक व्याख्याने दिली आणि 1931 साली जॉर्ज पुटनमशी लग्न केले.

दोघांचे नाते सुदृढ होते.

मला माझं काम करायचं, विमान उडवायचं स्वातंत्र्य हवं. आपण एकमेकांसोबत खुश नसलो तर वर्षभरातच वेगळं होऊ.

मी वचन देतो . तला मी नेहमीच प्रोत्साहन देईन.

ती उड्डाण कौशल्यावर मेहनत घेऊ लागली. एकटीने अटलांटिक महासागर पार करण्याचे स्वप्न ती विसरली नव्हती. 20 मे 1932 रोजी, रात्री 7 वाजता तिने न्यू फाऊंडलंडमधून एका इंजिनाच्या *व्हेगा* या विमानातून उड्डाण केले..




अचानक परिस्थिती पालटली.




तिचे विमान एका भयंकर वादळात सापडले.



वादळाच्या वर जायला बघू. पण जास्त उंच गेलं तर विमानावर बर्फ जमा होईल.

पंखांवर बर्फ जमा झालाच. विमान गिरकी घेऊन नियंत्रणाच्या बाहेर गेले.



ते वेगाने 3,000 फूट खाली आले. खाली उबदार हवेमुळे बर्फ वितळला. अमेलियाने विमान नियंत्रणात आणले.




इंजिनमधून ज्वाळा बाहेर पडू लागल्या. पण उमेद न हरता ती विमान चालवत राहिली. पहाटेच्या सुमारास तिला समोर जमीन दिसली, डोंगर आणि त्यावरचे वादळी ढग आणि रेल्वेरुळसुद्धा दिसले




पण शेवटी तिला एक गवताळ कुरण दिसले. तिने तिथेच विमान उतरवले. पंधरा तास अठरा मिनिटे विमान चालवून ती अमेरिकेहून आयर्लंडमधील *लंडनडेरी* शहरात आली होती.




अखेरीस, तिने एकटीने विमान चालवून अटलांटिक महासागर पार केलाच. ती जगातील अशी पहिलीच स्त्री आणि अमेरिकेची खरीखुरी नायिका ठरली.

लंडनमध्ये राजाने तिचे कौतुक केले आणि अमेलियाला राजपुत्रासोबत नृत्य करण्याची संधी मिळाली.



पॅरिसमध्ये तिला पदक प्रदान करण्यात आले.



हे सन्मान पदक आपल्या अत्युच्च कामगिरीसाठी.

बेल्जियमच्या राजानेही तिला पदक दिले.




अमेरिकेत व्हाइट हाऊसने तिचे यथोचित स्वागत केले. तिथे अध्यक्ष *हूवर* यांनी *नॅशनल जिओग्राफीक सोसायटी*चे सुवर्णपदक देऊन तिचा सन्मान केला.




मग अमेलिया प्रशांत महासागर पार करून *होनोलुलू*वरून *कॅलिफोर्निया*ला गेली. असा विक्रम करणारी ती पहिलीच वैमानिक होती. *लॉसएजंल्स* ते *मेक्सिकोसिटी* आणि *मेक्सिकोसिटी* ते *न्यूयॉर्क* एकटीने उड्डाण करणारीही ती पहिलीच मनुष्य होती.

न्यूयॉर्क विमानतळावर तिच्या विमानाभोवती लोकांची अलोट गर्दी झाली.




1935 साली ती *पर्ड्यू* विद्यापीठात शिकवायला गेली. तेथील विद्यार्थिनींशी तिने मनमोकळ्या गप्पा मारल्या.
एखादं काम करावसं वाटलं तर जरूर करा. ते काम पूर्वी कुणा स्त्रीने केलं नाही, म्हणून काय झालं!


विद्यापीठाने *अमेलिया एरहार्ट निधी*साठी देणग्या गोळा केल्या.
तुला उड्डाणाचे प्रयोग करण्यासाठी या 50,000 डॉलर निधीतून नवं विमान घे.


अमेलियाने नवीन दोन इंजिनांचे *लॉकहीड इलेक्ट्रा* हे विमान घेतले. त्यात अत्याधुनिक उपकरणे होती. ते खूप मोठे आणि सुरक्षित विमान होते.
जॉर्ज, यातून मला जगभर फिरायचंय, विषुववृत्तावरून उडायचंय. याआधी कुणी विमानाने पृथ्वीवरचं हे सर्वाधिक अंतर कापलेलं नाहीए.
तुला लागेल ती मदत करेन मी.


अमेलिया उड्डाणामार्गाचा अभ्यास करू लागली. जॉर्जने दूरवरच्या ठिकाणी तिला इंधन आणि विमानाचे नादुरुस्त भाग मिळू शकतील, याची व्यवस्था केली.
मार्चमध्ये ती आणि *फ्रेड नूनन* हा वैमानिक विमानाने हवाईला गेले. तिथून उड्डाण केल्यावर काही गडबड झाली आणि त्यांचे विमान कोसळले.
तुम्ही ठीक आहात का?
मी ठीक आहे. पुन्हा प्रयत्न करायला हवा.

1 जून 1937 रोजी विमान दुरुस्त झाले. अमेलिया आणि फ्रेड यांनी पुन्हा उड्डाण केले. पण यावेळी त्यांनी विमान पूर्वेकडे नेले.



किनाऱ्यावरून खाली दक्षिण अमेरिकेकडे....



अटलांटिकवरून दक्षिण आफ्रिकेकडे....



जंगले आणि वाळवंटांवरून भारताकडे....

चाळीस दिवसांत त्यांनी बावीस हजार मैल उड्डाण केले. यापुढे मोहिमेतील सर्वात मोठा टप्पा गाठायचा होता.

न्यू गिनिआतील *लाई* शहर ते *हाऊलँड बेट* हे 2,556 मैल अंतर. हाऊलँड ही प्रशांत महासागरातील एक बिंदुवत जमीन होती. ती शोधायला फार कसब लागणार होते.

2 जुलैचे उड्डाण पाहिलेले लोक अमेलिया एरहार्ट आणि फ्रेड नूनन यांचे शेवटचे दर्शन घेणारे लोक होते.

हाऊलँडमध्ये तटरक्षक जहाज *इटास्का* अमेलियाला मार्गदर्शन करणार होते. रात्रभर इटास्का संदेश पाठवत होते.




पण अमेलियाच्या रेडिओला इटास्काचे संदेश मिळत नव्हते. दिवस उजाडला .... आणि एक अखेरचा संदेश.




सकाळी 10 वाजता तिच्या विमानाचे इंधन संपले असावे. तिचा शोध घ्यायला अमेरिकी नौदलाने इतिहासातील सर्वात मोठी सागरी शोध मोहीम राबवली.



त्यात एक युद्धनौका, चार विनाशिका आणि 60 विमाने होती.

अमेलिया, फ्रेड आणि त्यांच्या विमानाचा काहीच थांगपत्ता लागला नाही. अमेलियाचा मृत्यू झाला, यावर लोकांचा विश्वासच बसत नव्हता.



तिच्या मृत्यूचा तपशील कधीच कळला नाही, तो महत्त्वाचाही नाही. एक स्त्री काय साध्य करू शकते, हे 39 वर्षांच्या अमेलिया एरहार्टने आपल्या कर्तृत्वाने सिद्ध केले आहे.

अंत